# महाराष्ट्र शासन

क्रमांक: बीयुडी-१६१९/प्र.क्र.५३/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २३ जानेवारी, २०२०

**विषय :-** विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी निधी वितरीत करण्याबाबत..
**वाचा** :- शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : पूरक-२०१९/प्र.क्र.९३/अर्थ-३, दिनांक ९/०७/२०१९.

**शासन ज्ञापन** :-

राज्यातील विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी लेखाशिर्ष (३०५३ ०१४६) खाली निधी वितरीत करण्यात येतो. सन २०१९-२० या वित्तीय वर्षात लेखाशीर्ष ३०५३-०१४६ खाली मूळ अर्थसंकल्पिय तरतूद रु.२.०० कोटी व पुरवणी मागणी रक्कम रु.१०.०० कोटी अशी एकूण रु.१२.०० कोटी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकान्वये मूळ अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी ६० टक्के मर्यादेत निधी वितरणास मान्यता देण्यात आलेली आहे. यानुसार, मूळ अर्थसंकल्पिय तरतुदीपैकी रु.१,१९,९९,४००/- इतकी रक्कम महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस यापूर्वी उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे.

३. आता लेखाशिर्ष (३०५३ ०१४६) खाली मंजूर रु.१०.०० कोटी पुरवणी मागणी रकमेच्या ६० टक्के मर्यादेत निधी विमानतळांच्या सुरक्षा, साफसफाई, दुरुस्ती तसेच देखभालीसाठी महाराष्ट्र विमानतळ विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**योजनेचे नाव- - मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १०२ विमानक्षेत्र, (००) (०१) विमानतळ/ धावपट्ट्या यांचा विकास (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)**

| बाब क्र. | सन २०१९-२० ची अर्थसंकल्पिय तरतूद | मूळ अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ६० % मर्यादेत यापूर्वी वितरीत तरतूद | पुरवणी मागणी रकमेच्या ६०% मर्यादेत आता वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|
| **३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)** | मूळ तरतूद- १.९९ कोटी<br>+<br>पुरवणी मागणी- रु.१०.०० कोटी | १,१९,९९,४०० | **६,००,००,०००** |
| | **एकूण** | १,१९,९९,४०० | **६,००,००,०००** |

**( अक्षरी रक्कम रुपये सहा कोटी फक्त )**

४. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १०२ विमानक्षेत्र, (००) (०१) विमानतळ/ धावपट्ट्या यांचा विकास (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

५. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो विहीत मुदतीत खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत खर्चाचा आढावा वेळोवेळी शासनास सादर करण्यात यावा.

६. हे शासन ज्ञापन वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२२१/२०१९/व्यय-४, दि.१६.०१.२०१९ अन्वये तसेच वित्त विभागाचे परिपत्रक दि.१ एप्रिल, २०१९ तसेच दि.९ जुलै २०१९ मधील सूचना विचारात घेऊन निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर परिपत्रकातील प्रत्येक अटीची पूर्तता करण्यात आली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२००१२३१६१९३२२८०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by M B TASHILDAR
Date: 2020.01.24 11:37:00 +05'30'

**(मो.बा.ताशिलदार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक/उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
३. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
६. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती.